॥ ७३ ॥ मी ब्रह्मात्मा निश्चय सदृढ ॥ वृत्तीनें खलून जाहला अतिदृढ ॥ जैसा इतरांसी देहाचा मीपणा वाड ॥ निश्चय बैसला बुद्धीसी ॥ ७४ ॥ देहात्म निश्चयाचि जयासी ॥ तो कदा मी ह्मणेना अन्यासी ॥ तैसा ब्रह्मात्मनिश्चय जया ज्ञात्यासी ॥ तो देहादिकां मी ह्मणेना ॥ ७५ ॥ ऐशिये देहात्मबुद्धीचे परी ॥ ब्रह्मात्मबुद्धि जाहली खरी ॥ भलतैसेही देहाचे व्यापारीं ॥ देहात्मबुद्धि नव्हे ॥ ७६ ॥ ऐशी दृढत जे होणें तत्त्वतां ॥ हेचि साफल्यता गा रविदत्ता ॥ यथार्थचि जाहली कृतकृत्यता ॥ प्राप्य तें प्राप्त जाहलें ॥ ७७ ॥ जाहली साधनाची पराकाष्ठा ॥ कांहीं उरली नाहीं कृतीची क्लिष्टा ॥ चरमास्थिति प्राप्त जाहली स्पष्टा ॥ जे भूतभविष्यज्ञात्याची ॥ ७८ ॥ नवतें तें जन्ममरण चुकलें ॥ लटिके बंधनपाश गळाले ॥ भवभय मृगजळवत् तें आटलें ॥ धोका स्थाणुपुरुष मेला ॥ ७९ ॥ अजन्माचा चुकला जन्म ॥ अमराचा मरोनि गेला यम ॥ निष्कर्माचें तुटलें कर्म ॥ संचित क्रियमाण प्रारब्ध ॥ ८० ॥ अज्ञान मायारूप मुली ॥ खपुष्पवत् ते जीवें मेली ॥ तिची संतति तेही निमाली ॥ विद्याविद्यारूप ॥ ८१॥ जीवाशिव प्रतिभास ते हारपले ॥ कीं प्रतिबिंब मुख्यांतत्वीं मीनलें ॥ सर्व सृष्टीचे कर्ते भोक्ते मेले ॥ आतां उत्पत्ति स्थिति कैंची ॥ ८२ ॥ असंगासी केलें असंग ॥ अभंगासी केलें अभंग ॥ अरोगियाचा गेला रोग ॥ ज्ञानमात्रा मीनतां ॥ ८३ ॥ अज्ञानतमीं आत्मा सूर्य ॥ पडिला होता द्वैतीं अद्वय ॥ त्याचे निज प्रकाशाचा दाऊनि प्रत्यय ॥ काढिला पावे स्वस्थळा ॥ ८४ ॥ ऐशी कृतकृत्यता खरी जाहली ॥ पावावयाची ते स्थिति

लाधली ॥ वरुती देहाची क्रीडा ते असे बोलिली ॥ जीवन्मुक्तदशा ॥ ८५ ॥ तयाचा देह वर्तो भलतैसा ॥ अमुक करणें हा विधि नसे सहसा ॥ अमुक न करणें हा निषेध आमासा ॥ नसे तयाप्रती ॥ ८६ ॥ तो करील तोचि विधि त्याचा ॥ न करील तोचि निषेध साचा ॥ तयासी नेम करील ऐसा वेदाचा ॥ बडिवार नसे ॥ ८७ ॥ तो नियम कवणासी असेना ॥ प्रेरकाचाही प्रेर्य होईना ॥ बहुत कासयासी हो वल्गना ॥ काळासीही न गवसे ॥ ८८ ॥ ब्रह्मात्मया कोठें असे काळ ॥ तोचि काळाचाही महाकाळ ॥ तथापि देहाचा अंत जो होणें बरळ ॥ तो प्रारब्ध क्षयीं होईल ॥ ८९ ॥ पद ॥ यदातदायं म्रियतां ॥ ज्या क्षणीं प्रारब्धकर्म विघडे ॥ त्या क्षणीं देहाचें पडे मढें ॥ तेव्हां हा मरेना कां सांकडें ॥ असे ब्रह्मात्मया केवीं ॥९०॥ कल्पवरी कर्मवशें राहिला ॥ कीं आजचि कर्म क्षयें मेला ॥ तरी संबंध काय असे तयाला ॥ जो निजांगें ब्रह्म ॥९१॥ जैसें आकाशींचिये सूर्याप्रती ॥ मृगजल आटलें कीं आली भरती ॥ हा संबंध नसे येणेंचि रीतीं ॥ देहादिक ब्रह्मात्मया ॥ ९२ ॥ पाहिजे तेव्हां कर्म हें सरो ॥ पाहिजे तेव्हां प्राणवियोगें मरो ॥ अथवा चिरकाळ कर्माधारें वावरो ॥ शेवटीं महाकल्पीं जळो ॥ ९३ ॥ परी ब्रह्मात्मा जो निजांगें ॥ अनिर्वाच्या संचला अभंगें ॥ तयासी ही न स्पर्शती सोंगें ॥ जे अज्ञानजानित ॥ ९४ ॥ देह हा केवळ प्रारब्धाधीन ॥ कर्म तोंवरी होय वर्तन ॥ कर्म सरतांचि पावेल मरण ॥ असा मरे तेव्हां मरो ॥ ९५ ॥ कर्म पाहतां त्रिधा प्रकारें ॥ त्यांत ज्ञान जाह- लिया द्वय वोसरे ॥ तिजें प्रारब्ध देहासी उरे ॥ तंही सरे भोगोनी ॥ ९६ ॥ अपरोक्ष ज्ञान

जेधवां जाहलें ॥ तेधवांचि संचित निपटून जळालें ॥ जैसें जागें होतांचि स्वप्न मावळलें ॥ भासलें जें शुभाशुभ ॥ ९७ ॥ कर्तेपणा जरी उद्भवेना ॥ तरी व्यर्थत्व येतसे क्रियमाणा ॥ तथापि घडे जें शुभाशुभ नाना ॥ त्याचे विभागी केले ॥९८॥ ज्ञातयानें जें शुभाशुभ करावें ॥ प्रारब्धानुकारें बळें घडावें ॥ त्याचे अकर्तेपणें संचित नव्हे ॥ तें भोगा यावें दोघांच्या ॥ ९९ ॥ ज्ञात्यासी निंदिती गांजिती ॥ व्यर्थ दुराग्रहें हेळसिती ॥ ते पापाचे वांटेकरी होती ॥ ज्ञाता अकर्ता अलेप ॥ ५५०० ॥ जे स्तविती पूजिती एकभावें ॥ सदा प्रवर्तले असती सेवे ॥ तयांसी ज्ञात्याचें पुण्य जें आघवें ॥ प्राप्त होतसे ॥ १ ॥ ऐसा श्रुतीनें नेमचि केला ॥ विभागी ज्ञात्याचे पापपुण्याला ॥ संबंध नाहीं ज्ञातयाला ॥ क्रियमाणाचा ॥ २ ॥ एवं संचित क्रियमाण दोनी ॥ ज्ञातयाचे गेले निपटूनी ॥ प्रारब्धमात्र तयालागूनी ॥ भोगार्थ उरलें ॥ ३ ॥ तेंही अज्ञानजनाचे बोधास्तव ॥ उरलेंसे श्रुति सांगे गौरव ॥ कीं अरे मूर्ख हो ज्ञात्याचें वर्तणें जें अपूर्व ॥ शेष प्रारब्धामुळें ॥ ४ ॥ येऱ्हवीं ज्ञाता तो नव्हे देहादिक ॥ तो केवळ निजांगें ब्रह्म एक ॥ तेथें प्रारब्धाचा कैंचा कुतर्क ॥ स्थापावया अन्यासी ॥ ५ ॥ तया ज्ञातयासी श्रुति सांगे ॥ अशेष कर्मा नाश जाला वेगें ॥ बहुवचनें त्रिविधाही प्रसंग ॥ भस्मोनी गेलें ॥ ६ ॥ देह मात्र उरला असे ह्मणोनी ॥ प्रारब्धास्तव बोलिलें वचनीं ॥ हेंही मुमुक्षूच भाग्य उदेलें गगनीं ॥ उपदेशास्तव उरले ॥ ७ ॥ जरी सुखदुःखें देहा घडती ॥ तरी काय उणीवता ज्ञानाप्रती ॥ आपेंआप भोग देऊन मावळती ॥ तरी बाध काय उरतां ॥ ८ ॥